**वाशिम जिल्ह्यातील पैनगंगा नदीवरील ११ बॅरेजेसच्या रु.७८७.१५ कोटी इतक्या किंमतीच्या प्रस्तावास व्दितीय सुधारित प्रशासकीय मान्यता मिळणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**जलसंपदा विभाग,**

**शासन निर्णय क्रमांकः संकिर्ण-२०२२/(१६०/२०२२)/लपा**

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

दिनांक-२९ मार्च, २०२३

**पहावे :- (१)** कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर यांचे जावक्र.३३४३/विपाविम /कातां ७(१)/ ११ बॅरेजेस/(५४४/२०१६)/२०२२, दिनांक २९/०४/२०२२ चे पत्र.

**(२)** कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर यांचे जावक्र.८२५४/विपाविम /कातां ७(१)/ ११ बॅरेजेस/(५४४/२०१६)/२०२२, दिनांक २५/११/२०२२ चे पत्र.

**प्रस्तावना:-**

वाशिम जिल्हातील पैनगंगा नदीवरील वरुड, जुमडा, कोकलगांव, अडगांव, गणेशपुर, राजगांव, उकळी, सोनगव्हाण, टणका, ढिल्ली व जयपुर या ११ बॅरेजेस प्रकल्पांना वाशिम जिल्हयातील विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ,नागपूर अंतर्गत सिंचन अनुशेष क्षेत्रामध्ये आहेत. या प्रकल्पात गोदावरी खोऱ्यातील पैनगंगा उपखोऱ्यातील पैनगंगा नदीवर ११ बॅरेजेस बांधण्यात आलेले आहेत. सदर प्रकल्पाद्वारे वाशिम जिल्ह्यातील वाशिम तालुक्यातील ५५५४ हे व हिंगोली जिल्ह्यातील २१३६ हे., असे एकूण ७६९० हे.क्षेत्रास सिंचनाचा लाभ मिळणार आहे. सदर ११ बॅरेजेसचा एकूण पाणीसाठा ३३.२७ दलघमी इतका आहे.

पैनगंगा नदीवरील वरुड (रू.७.८३ कोटी), जुमडा (रू.९.६१ कोटी), कोकलगांव (रू.८.५६ कोटी), अडगांव (रू.८.५९ कोटी), गणेशपुर (रू.८.६६ कोटी), राजगांव (रू.६.९५ कोटी), उकळी (रू.७.८६ कोटी), सोनगव्हाण (रू.८.६८ कोटी), टणका (रू.६.८४ कोटी), ढिल्ली(रू.९.४५ कोटी) व जयपुर (रू.७.८२ कोटी) या ११ बॅरेजेस प्रकल्पांना सन २००८-०९ च्या दरसूचीनुसार दिनांक१२/०२/२००९ रोजी मुळ प्रशासकीय मान्यता आहे.तसेच सदर पैनगंगा नदीवरील वरुड (रू.५५.८१ कोटी), जुमडा (रू.६०.५५ कोटी), कोकलगांव (रू.६०.६७ कोटी), अडगांव (रू.५६.२८ कोटी), गणेशपुर (रू.५७.६१ कोटी), राजगांव (रू.५४.५८ कोटी), उकळी (रू.८९.२७ कोटी), सोनगव्हाण (रू.६१.९० कोटी), टणका (रू.६७.६८ कोटी), ढिल्ली (रू.७३.८७ कोटी) व जयपुर (रू.७८.२० कोटी) या ११ बॅरेजेस प्रकल्पांना शासन निणर्य क्र.संकीर्ण २२१५/(२८६/२०१५)/लपा-२, मंत्रालय, मुंबई दिनांक ०२/०१/२०१६ अन्वये रू.७१६.४२ कोटी इतक्या किंमतीस दरसूची वर्ष २०१४-१५ नुसार प्रथम सुधारीत प्रशासकीय मान्यता आहे.

पैनगंगा नदीवरील वरुड, जुमडा, कोकलगांव, अडगांव, गणेशपुर, राजगांव, उकळी, सोनगव्हाण, टणका, ढिल्ली व जयपुर या ११ बॅरेजेस प्रकल्पांच्या व्दितीय सुधारीत प्रशासकीय मान्यता प्रस्तावास राज्यस्तरीय तांत्रिक सल्लागार समितीच्या दि.१८/०२/२०२१ रोजी झालेल्या १५६ व्या बैठकीत रू.७८७.१५ कोटी (दरसूची २०१८-१९) किंमतीस सहमती दिली आहे. दिनांक २२/११/२०२१ रोजी झालेल्या सचिव स्तरीय उपसमितीच्या बैठकीत राज्यस्तरीय तांत्रिक सल्लागार समितीच्या तपासणी अहवालातील मुद्दा क्र.२६ व २७ ची पुर्तता करण्याच्या तसेच प्रकल्पाची सर्व कामे राज्यस्तरीय तांत्रिक सल्लागार समीतीने विहीत केलेल्या कालावधीत पुर्ण करणेच्या अटीच्या अधिन राहुन प्रस्तुत पैनगंगा नदीवरील वरुड, जुमडा,कोकलगांव, अडगांव, गणेशपुर, राजगांव,उकळी, सोनगव्हाण,टणका,ढिल्ली व जयपुर या ११ बॅरेजेस प्रकल्पांचा व्दितीय सुधारीत प्रशासकीय मान्यतेचा प्रस्ताव पुढील निर्णयार्थ मा.मंत्रीमंडळास सादर करणे करीता नियामक मंडळास शिफारस करण्यात आली होती. तसेच दिनांक १४/०२/२०२२ रोजी संपन्न झालेल्या नियामक मंडळाच्या ८२ व्या बैठकीमध्ये विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ नागपुर अंतर्गत प्रस्तुत पैनगंगा नदीवरील वरुड, जुमडा,कोकलगाव, अडगाव, गणेशपुर, राजगाव,उकळी, सोनगव्हाण,टणका,ढिल्ली व जयपुर या ११ बॅरेजेस प्रकल्पांच्या रु.७८७.१५ कोटी इतक्या किंमतीच्या व्दितीय सुधारीत प्रशासकीय मान्यता प्रस्तावास राज्यस्तरीय तांत्रीक सल्लागार समीतीच्या तपासणी अहवालातील मुद्दा क्र.२६ व २७ ची पुर्तता करण्याच्या अटीच्या अधीन राहुन, तसेच सचिवस्तरीय उपसमीतीच्या दिनांक २२/११/२०२१ च्या बैठकीमध्ये उपस्थीत केलेल्या मुद्यांचे अटिचे अधीन राहुन केलेल्या शिफारशीनुसार या प्रकल्पांचा व्दितीय सुधारीत प्रशासकीय मान्यता प्रस्ताव शिफारशीसह मा.मंत्रीमंडळासमोर ठेवण्यास

नियामक मंडळाने मान्यता दिली. नियामक मंडळाच्या शिफारशीनुसार मा.मंत्रिमंडळाच्या मान्यतेकरिता सदर प्रस्ताव सादर करण्यात आला होता.सदर प्रकल्पाच्या किमतीतील वाढ ही भूसंपादनाच्या किंमतीतील वाढ, इतर कारणांमुळे झालेली वाढ, अपुऱ्या तरतुदींमुळे झालेली वाढ व अनुषांगिक खर्चातील बचत इ.मुळे होत आहे. वरील सर्व बाबींचा विचार करून वाशिम जिल्हातील पैनगंगा नदीवरील वरुड, जुमडा, कोकलगांव, अडगांव, गणेशपुर, राजगांव, उकळी, सोनगव्हाण, टणका, ढिल्ली व जयपुर या ११ बॅरेजेससाठी दरसूची २०१८-१९ वर आधारित रु.७८७.१५ कोटी इतक्या किंमतीस व्दितीय सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याचा निर्णय मा.मंत्रीमंडळाने दिनांक १४/०२/२०२३ रोजीप्रमाणे घेतला आहे. त्यानुसार शासन निर्णय निर्गमित करण्याची बाब विचाराधिन आहे.

**शासन निर्णय :-**

वाशिम जिल्हातील पैनगंगा नदीवरील ११ बॅरेजेस वरुड, जुमडा, कोकलगांव, अडगांव, गणेशपुर, राजगांव, उकळी, सोनगव्हाण, टणका, ढिल्ली व जयपुर, या प्रकल्पांना जलसंपदा विभाग दरसूची २०१८-१९ वर आधारित रु.७८७.१५ कोटी (सातशे सत्त्याऐंशी कोटी, पंधरा लक्ष फक्त) इतक्या किंमतीस (प्रत्यक्ष कामासाठी एकूण रु.७५१.५७ कोटी व अनुषंगीक खर्च रू.३५.५८ कोटी) व्दितीय सुधारीत प्रशासकीय मान्यता खालील अटींच्या अधीन राहून प्रदान करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे. प्रकल्पाचा उपशिर्ष निहाय तरतूदींचा गोषवारा परिशिष्ट - "अ" मध्ये सोबत जोडला आहे.

१) संपूर्ण प्रकल्प हा प्रस्तावित व्दितीय सु.प्र.मा.किंमतीच्या मर्यादेत करण्याचीजबाबदारी/हमी महामंडळाची राहील.

२) सदर प्रकल्पाच्या व्दितीय सु.प्र.मा. प्रस्तावामध्ये अंतर्भुत किंमतीस तांत्रिक मान्यता प्राप्त करुन घ्यावी.

३) सदर प्रकल्पासाठी कोणत्याही प्रयोजनार्थ मंजूर प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेबाहेर जाऊन, निधी वितरण अथवा अतिरिक्त खर्च करता येणार नाही. या संदर्भात जलसंपदा विभागाने प्रचलित शासन निर्णय, नियम, CVC ची मार्गदर्शक तत्वे, वित्तीय अधिकार मर्यादा, विहित केलेली निविदा कार्यपध्दती याची काटेकोरपणे अंमलबजावणी करणे आवश्यक आहे व याची जबाबदारी संपूर्णपणे महामंडळाची राहील.

४) सदर प्रकल्पासंदर्भात आधीच्या कालावधीमध्ये जर काही आर्थिक व कार्यपद्धतीत अनियमितता झाल्या असतील, कोणतीही नियम बाहय कार्यवाही करण्यात आली असेल अथवा ज्यामुळे आर्थिक घोटाळा निर्माण होण्याची शक्यता असेल अशा कोणत्याही बाबींना शासनाने सहमती दिली आहे असे म्हणता येणार नाही व अशी कोणतीही सहमती / मान्यता शासनाने प्रस्तुत प्रकल्पाबाबत दिलेली नाही. अशा प्रत्येक प्रकरणी व अशा प्रत्येक बाबीवर महामंडळाने विहित कार्यपध्दती अनुसरुन सक्षम प्राधिकाऱ्यांची मान्यता घेणे आवश्यक राहील. याबाबतची संपूर्णपणे जबाबदारी महामंडळाची राहील.

५) व्दितीय सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याच्या निर्णयामुळे या प्रकल्पाबाबत सुरु असलेल्या अथवा भविष्यात उद्भवणाऱ्या विभागीय चौकशीच्या कार्यवाहीस कोणतीही बाधा पोहचणार नाही, ती कार्यवाही तशीच चालू ठेवावी.

६) सुधारित प्रशासकीय मान्यता म्हणजे अहवालातील तांत्रीक बाबी अथवा निविदा विषयक क्षेत्रीय स्तरावरील निर्णयास किंवा झालेल्या क्षेत्रीय अनियमिततेस मान्यता गृहीत धरली जाणार नाही. तसेच सुधारित प्रशासकीय मान्यता देणारे प्राधिकारी हे झालेल्या क्षेत्रीय निर्णयास व अनियमिततेस जबाबदार नसतील याबाबतची जबाबदारी निर्णय घेणाऱ्या क्षेत्रीय अधिकाऱ्यांची राहील, अशा तांत्रीक व निविदा विषयक प्रकरणांची तपासणी त्यावेळी प्रचलित शासन निर्णयानुसार करणे आवश्यक असून याची सर्वस्वी जबाबदारी महामंडळाची राहील.

७) सदर प्रकल्पावर लाभधारकांची पाणी वापर संस्था स्थापन करण्यात यावी.

या योजनेच्या कामावरील खर्च मागणी क्र.आय-५, मुख्य लेखाशीर्ष "४७०२”, लघु पाटबंधारे यावरील भांडवली खर्च, (८०)-सर्वसाधारण, (१९०)-सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणूका, (००)(०५), विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ भाग भांडवली अंशदान (४७०२ ५१०१) या लेखाशीर्षाखाली खर्ची घालावा आणि तो मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.४/२०२३/कार्यासन १४३४ , दिनांक १०/०१/२०२३ व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.७/२०२३/ कार्यासन व्यय-१२, दिनांक २५/०१/२०२३ अन्वये प्राप्त सहमतीने तसेच दिनांक १४/०२/२०२३ रोजी झालेल्या मा.मंत्रीमंडळाचे निर्णयाच्या अनुषंगाने सहमती दिलेली आहे.

या योजनेस प्रदान करण्यात आलेली व्दितीय सुधारित प्रशासकीय मान्यता लपा कार्यासनाच्या प्रशासकीय मान्यता नोंदवहीत २५६ या अनुक्रमांकावर नोंदविण्यात आली आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२३०३२९२०२०४२४६२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

AMOL BAPURAO FUNDE

Digitally signed by AMOL BAPURAO FUNDE
DN: CN = AMOL BAPURAO FUNDE, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = WATER RESOURCES DEPARTMENT
Date: 2023.03.29 21:15:28 +05'30'

**(अमोल फुंदे)**
**उपसचिव, महाराष्ट्र शासन**

**सहपत्र :- परिशिष्ट "अ"**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२. मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
३. मा.उपमुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
४. सर्व मा.मंत्री / मा.राज्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
५. मा.विरोधी पक्ष नेते, विधानसभा / विधानपरिषद, महाराष्ट्र राज्य, विधानमंडळ सचिवालय, मुंबई
६. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य
७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
८. महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
९. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. अपर मुख्य सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. सचिव (प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४. कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर
१५. महासंचालक, संकल्पचित्र, प्रशिक्षण, जलविज्ञान, संशोधन व धरण सुरक्षा, नाशिक.
१६. जिल्हाधिकारी, वाशिम
१७. आंतर वित्त सल्लागार व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१८. मुख्य अभियंता, विशेष प्रकल्प, जलसंपदा विभाग, अमरावती
१९. उप सचिव (निवसं), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई -३२.
२०. अधीक्षक अभियंता, वाशिम पाटबंधारे मंडळ, वाशिम
२१. वित्त विभाग (व्यय- १२), मंत्रालय, मुंबई -३२.
२२. नियोजन विभाग (कार्यासन १४३४), मंत्रालय, मुंबई -३२.
२३. अर्थ शाखा -१ व २, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई -३२
२४. ल.पा. कार्यासन (संग्रहार्थ)

परिशिष्ट-अ

पैनगंगा नदीवरील ११ बॅरेजेच्या रु.७८७.१५ कोटी इतक्या किंमतीच्या प्रस्तावास व्दितीय सुधारित प्रशासकीय मान्यता मिळणेबाबत.

शासन निर्णय क्रमांकःसंकिर्ण २०२२/(१६०/२०२२)/लपा दिनांक: २९ मार्च २०२३ चे परिशिष्ट

उपशिर्षनिहाय तरतूदी (किंमत रू. कोटी)

| उपशिर्ष | मंजूर प्रथम सुप्रमा नुसार (दरसूची २००८-०९) | प्रस्तावित द्वितिय सुप्रमा नुसार (दरसूची२०१८-१९) | वाढ/घट |
|---|---|---|---|
| **१)वरुड बॅरेज** | | | |
| अ-प्राथमिक | ०.०६ | ०.०६ | ० |
| ब-भूसंपादन | ५.३० | ३.५२ | -१.७८ |
| क-बांधकाम | ४४.८३ | ४२.०० | -२.८३ |
| के - इमारती | ०.२२ | ०.२२ | ० |
| ओ -संकिर्ण | ०.२३ | ६.९० | ६.६७ |
| पी- देखभाल व दुरुस्ती | ०.२३ | ०.२३ | ० |
| आर- दळणवळण | ०.३ | ०.७३ | ०.४३ |
| एक्स - पर्यावरण | ०.०५ | ०.०५ | ० |
| **एकूण:** | **५१.२२** | **५३.७१** | **२.४९** |
| अनुषंगिक खर्च | **४.५९** | **२.४७** | -२.१२ |
| **एकूण:** | **५५.८१** | **५६.१८** | **०.३७** |
| **२)जुमडा बॅरेज** | | | |
| अ-प्राथमिक | ०.०४ | ०.०४ | ० |
| ब-भूसंपादन | ५.४४ | ५.४५ | ०.०१ |
| क-बांधकाम | ४९.१९ | ४५.१३ | -४.०६ |
| के - इमारती | ०.२२ | ०.२२ | ० |
| ओ -संकिर्ण | ०.२५ | ६.७४ | ६.४९ |
| पी- देखभाल व दुरुस्ती | ०.२५ | ०.२५ | ० |
| आर- दळणवळण | ०.१ | ०.३१ | ०.२१ |
| एक्स - पर्यावरण | ०.०५ | ०.०५ | ० |
| **एकूण:** | **५५.५४** | **५८.१९** | **२.६५** |
| अनुषंगिक खर्च | **५.०१** | **३.०३** | -१.९८ |
| **एकूण:** | **६०.५५** | **६१.२२** | **०.६७** |
| **३)कोकलगाव बॅरेज** | | | |
| अ-प्राथमिक | ०.०७ | ०.०७ | ० |
| ब-भूसंपादन | ४.५९ | ३.६५ | -०.९४ |
| क-बांधकाम | ४९.८४ | ४७.१३ | -२.७१ |
| के - इमारती | ०.२३ | ०.२३ | ० |
| ओ -संकिर्ण | ०.२५ | १३.२९ | १३.०४ |
| पी- देखभाल व दुरुस्ती | ०.२५ | ०.२५ | ०.०० |
| आर- दळणवळण | ०.३० | १.९० | १.६ |
| एक्स - पर्यावरण | ०.०५ | ०.०५ | ०.०० |
| **एकूण:** | **५५.५८** | **६६.९७** | **१०.९९** |
| अनुषंगिक खर्च | **५.०९** | **३.७७** | -१.३२ |
| **एकूण:** | **६०.६७** | **७०.३४** | **९.६७** |
| **४)अडगाव बॅरेज** | | | |

| उपशिर्ष | मंजूर प्रथम सुप्रमा नुसार (दरसूची २००८-०९) | प्रस्तावित द्वितिय सुप्रमा नुसार (दरसूची २०१८-१९) | वाढ/घट |
|---|---|---|---|
| अ-प्राथमिक | ०.०८ | ०.०८ | ०.०० |
| ब-भूसंपादन | २.९६ | ३.६० | ०.६४ |
| क-बांधकाम | ४७.५३ | ४५.४९ | -२.०४ |
| के - इमारती | ०.२३ | ०.२३ | ०.०० |
| ओ -संकिर्ण | ०.२४ | ८.४२ | ८.१८ |
| पी- देखभाल व दुरुस्ती | ०.२४ | ०.२४ | ०.०० |
| आर- दळणवळण | ०.१ | ०.४३ | ०.३३ |
| एक्स - पर्यावरण | ०.०५ | ०.०५ | ०.०० |
| **एकूण:** | **५१.४३** | **५८.५४** | **७.११** |
| अनुषंगिक खर्च | **४.८५** | **३.०५** | -१.८० |
| **एकूण:** | **५६.२८** | **६१.५९** | **५.३१** |
| **५)गणेशपूर बॅरेज** | | | |
| अ-प्राथमिक | ०.०४ | ०.०४ | ०.०० |
| ब-भूसंपादन | ४.६६ | ३.९० | -०.७६ |
| क-बांधकाम | ४७.१५ | ४२.६९ | -४.४६ |
| के - इमारती | ०.२३ | ०.२३ | ०.०० |
| ओ -संकिर्ण | ०.२३ | ६.८१ | ६.५८ |
| पी- देखभाल व दुरुस्ती | ०.२४ | ०.२४ | ०.०० |
| आर- दळणवळण | ०.२० | १.३६ | १.१६ |
| एक्स - पर्यावरण | ०.०५ | ०.०५ | ०.०० |
| **एकूण:** | **५२.८** | **५५.३२** | **२.५२** |
| अनुषंगिक खर्च | **४.८१** | **२.८८** | -१.९३ |
| **एकूण:** | **५७.६१** | **५८.२०** | **०.५९** |
| **६)राजगांव बॅरेज** | | | |
| अ-प्राथमिक | ०.०३ | ०.०३ | ०.०० |
| ब-भूसंपादन | ३.६८ | २.७० | -०.९८ |
| क-बांधकाम | ४५.३ | ४३.२८ | -२.०२ |
| के - इमारती | ०.२३ | ०.२३ | ०.०० |
| ओ -संकिर्ण | ०.२३ | ८.८४ | ८.६१ |
| पी- देखभाल व दुरुस्ती | ०.२३ | ०.२३ | ०.०० |
| आर- दळणवळण | ०.२ | १.३१ | १.११ |
| एक्स - पर्यावरण | ०.०५ | ०.०५ | ०.०० |
| **एकूण:** | **४९.९५** | **५६.६७** | **६.७२** |
| अनुषंगिक खर्च | **४.६३** | **२.६३** | -२.०० |
| **एकूण:** | **५४.५८** | **५९.३०** | **४.७२** |
| **७)उकळी बॅरेज** | | | |
| अ-प्राथमिक | ०.०७ | ०.०७ | ०.०० |
| ब-भूसंपादन | ८.९७ | १४.१५ | ५.१८ |
| क-बांधकाम | ७१.४८ | ६९.९२ | -१.५६ |
| के - इमारती | ०.२३ | ०.२३ | ०.०० |
| ओ -संकिर्ण | ०.३६ | ७.९१ | ७.५५ |
| पी- देखभाल व दुरुस्ती | ०.३६ | ०.३६ | ०.०० |

| उपशिर्ष | मंजूर प्रथम सुप्रमा नुसार (दरसूची २००८-०९) | प्रस्तावित द्वितिय सुप्रमा नुसार (दरसूची२०१८-१९) | वाढ/घट |
|---|---|---|---|
| आर- दळणवळण | ०.४५ | १.३७ | ०.९२ |
| एक्स - पर्यावरण | ०.०५ | ०.०५ | ०.०० |
| **एकूण:** | **८१.९७** | **९४.०६** | **१२.०९** |
| अनुषंगिक खर्च | **७.३०** | **३.८८** | -३.४२ |
| **एकूण:** | **८९.२७** | **९७.९४** | **८.६७** |
| **८)सोनगव्हाण बॅरेज** | | | |
| अ-प्राथमिक | ०.०७ | ०.०७ | ०.०० |
| ब-भूसंपादन | ७.३८ | ८.७४ | १.३६ |
| क-बांधकाम | ४८.४३ | ४५.०० | -३.४३ |
| के - इमारती | ०.२३ | ०.२३ | ०.०० |
| ओ -संकिर्ण | ०.२४ | ८.७१ | ८.४७ |
| पी- देखभाल व दुरुस्ती | ०.२४ | ०.२४ | ०.०० |
| आर- दळणवळण | ०.३० | ०.५३ | ०.२३ |
| एक्स - पर्यावरण | ०.०५ | ०.०५ | ०.०० |
| **एकूण:** | **५६.९४** | **६३.५७** | **६.६३** |
| अनुषंगिक खर्च | **४.९६** | **३.२९** | -१.६७ |
| **एकूण:** | **६१.९०** | **६६.८६** | **४.९६** |
| **९)टणका बॅरेज** | | | |
| अ-प्राथमिक | ०.०४ | ०.०३ | -०.०१ |
| ब-भूसंपादन | ४.६४ | ३.४८ | -१.१६ |
| क-बांधकाम | ५६.२४ | ५२.३९ | -३.८५ |
| के - इमारती | ०.२२ | ०.२२ | ०.०० |
| ओ -संकिर्ण | ०.२८ | ९.६६ | ९.३८ |
| पी- देखभाल व दुरुस्ती | ०.२८ | ०.२८ | ०.०० |
| आर- दळणवळण | ०.२ | ०.५९ | ०.३९ |
| एक्स - पर्यावरण | ०.०५ | ०.०५ | ०.०० |
| **एकूण:** | **६१.९५** | **६६.७०** | **४.७५** |
| अनुषंगिक खर्च | **५.७३** | **३.१७** | -२.५६ |
| **एकूण:** | **६७.६८** | **६९.८७** | **२.१९** |
| **१०)ढिल्ली बॅरेज** | | | |
| अ-प्राथमिक | ०.०६ | ०.०६ | ०.०० |
| ब-भूसंपादन | ५.८९ | ६.५५ | ०.६६ |
| क-बांधकाम | ६०.७६ | ५६.९५ | -३.८१ |
| के - इमारती | ०.२३ | ०.२३ | ०.०० |
| ओ -संकिर्ण | ०.३ | १०.१७ | ९.८७ |
| पी- देखभाल व दुरुस्ती | ०.३० | ०.३० | ०.०० |
| आर- दळणवळण | ०.१० | १.५८ | १.४८ |
| एक्स - पर्यावरण | ०.०५ | ०.०५ | ०.०० |
| **एकूण:** | **६७.६९** | **७५.८९** | **८.२०** |
| अनुषंगिक खर्च | **६.१८** | **३.२२** | -२.९६ |
| **एकूण:** | **७३.८७** | **७९.११** | **५.२४** |

| उपशिर्ष | मंजूर प्रथम सुप्रमा नुसार (दरसूची २००८-०९) | प्रस्तावित द्वितिय सुप्रमा नुसार (दरसूची २०१८-१९) | वाढ/घट |
|---|---|---|---|
| **११)जयपुर बॅरेज** | | | |
| अ-प्राथमिक | ०.०६ | ०.०६ | ०.०० |
| ब-भूसंपादन | ११.३५ | २८.६३ | १७.२८ |
| क-बांधकाम | ५९.५३ | ५९.२३ | -०.३० |
| के - इमारती | ०.२३ | ०.२३ | ०.०० |
| ओ -संकिर्ण | ०.३० | ११.६४ | ११.३४ |
| पी- देखभाल व दुरुस्ती | ०.३० | ०.३० | ०.०० |
| आर- दळणवळण | ०.३० | २.२१ | १.९१ |
| एक्स - पर्यावरण | ०.०५ | ०.०५ | ०.०० |
| **एकूण:** | **७२.१२** | **१०२.३५** | **३०.२३** |
| अनुषंगिक खर्च | ६.०८ | ४.१९ | -१.८९ |
| **एकूण:** | **७८.२०** | **१०६.५४** | **२८.३४** |
| **एकुण ११ बॅरेज प्रकल्प** | **६५७.१९** | **७५१.५७** | **९४.३८** |
| **अनुषंगिक खर्च११ बॅरेज** | **५९.२३** | **३५.५८** | **-२३.६५** |
| **एकूण:११ बॅरेज प्रकल्प** | **७१६.४२** | **७८७.१५** | **७०.७३** |

**मापदंडाबाबतचा तपशील :-**

| अ. क्र. | निकष | मंजूर प्रथम सुप्रमा मधील मुल्यांक/ (मापदंड) | प्रस्तावित व्दितय सुप्रमा मधील मुल्यांक | प्रचलीत मापदंड | शेरा |
|---|---|---|---|---|---|
| **१.वरुड बॅरेज** | | | | | |
| i) | लाभव्यय गुणोत्तर | १.३७ | १.३२ | १ पेक्षा जास्त | प्रकल्प मापदंडात बसतो. |
| ii) | पाणी साठ्याची किंमत प्रती सघमी | रु.२,०६,७०३/- | रु.२,०८,०२४/- | रु.१,२२,१३२/ - पेक्षा कमी | प्रकल्प मापदंडात बसत नाही |
| iii) | आर्थिक परतावा दर(ERR) | १६.२० | १८.३१ | १२ पेक्षा जास्त | प्रकल्प मापदंडात बसतो. |
| iv) | सिंचन क्षेत्राची प्रति हेक्टरी किंमत | रु.१०.४३ लक्ष प्रति हे. | रु. १०.५० लक्ष प्रति हेक्टर | मापदंड नाही | -- |
| **२.जुमडा बॅरेज** | | | | | |
| i) | लाभव्यय गुणोत्तर | १.६७ | १.६१ | १ पेक्षा जास्त | प्रकल्प मापदंडात बसतो. |
| ii) | पाणी साठ्याची किंमत प्रती सघमी | रु.१,८३,४८४/- | रु.१,८२,२२२/- | रु.१,२२,१३२/ - पेक्षा कमी | प्रकल्प मापदंडात बसत नाही |
| iii) | आर्थिक परतावा दर(ERR) | १६.०० | २०.७९ | १२ पेक्षा जास्त | प्रकल्प मापदंडात बसतो. |

| अ. क्र. | निकष | मंजूर प्रथम सुप्रमा मधील मुल्यांक/ (मापदंड) | प्रस्तावित व्दितय सुप्रमा मधील मुल्यांक | प्रचलीत मापदंड | शेरा |
|---|---|---|---|---|---|
| **१.वरुड बॅरेज** | | | | | |
| iv) | सिंचन क्षेत्राची प्रति हेक्टरी किंमत | रु.८.५४ लक्ष प्रति हे. | रु. ८.६३ लक्ष प्रति हेक्टर | मापदंड नाही | -- |
| **३.कोकलगाव बॅरेज** | | | | | |
| i) | लाभव्यय गुणोत्तर | १.३७ | २.०६ | १ पेक्षा जास्त | प्रकल्प मापदंडात बसतो. |
| ii) | पाणी साठ्याची किंमत प्रती सघमी | रु.१,८१,६४६/- | रु.२,१०,७८१/- | रु.१,२२,१३२/- पेक्षा कमी | प्रकल्प मापदंडात बसत नाही |
| iii) | आर्थिक परतावा दर(ERR) | १६.२० | २६.२२ | १२ पेक्षा जास्त | प्रकल्प मापदंडात बसतो. |
| iv) | सिंचन क्षेत्राची प्रति हेक्टरी किंमत | रु.५.८० लक्ष प्रति हे. | रु. ६.७२ लक्ष प्रति हेक्टर | मापदंड नाही | -- |
| **४.अडगांव बॅरेज** | | | | | |
| i) | लाभव्यय गुणोत्तर | १.४३ | १.५३ | १ पेक्षा जास्त | प्रकल्प मापदंडात बसतो. |
| ii) | पाणी साठ्याची किंमत प्रती सघमी | रु.१,७३,७०४/- (रु.२५,८५०/- पेक्षा कमी) | रु.१,९०,०७०/- | रु.१,२२,१३२/- पेक्षा कमी | प्रकल्प मापदंडात बसत नाही |
| iii) | आर्थिक परतावा दर(ERR) | १५.४९ | २४.४८ | १२ पेक्षा जास्त | प्रकल्प मापदंडात बसतो. |
| iv) | सिंचन क्षेत्राची प्रति हेक्टरी किंमत | रु.८.५८ लक्ष प्रति हे. | रु. ९.३९ लक्ष प्रति हेक्टर | मापदंड नाही | -- |
| **५.गणेशपुर बॅरेज** | | | | | |
| i) | लाभव्यय गुणोत्तर | १.४३ | १.६० | १ पेक्षा जास्त | प्रकल्प मापदंडात बसतो. |
| ii) | पाणी साठ्याची किंमत प्रती सघमी | रु.१,८७,०४५/- (रु.२५,८५०/- पेक्षा कमी) | रु.१,८८,६९८/- | रु.१,२२,१३२/- पेक्षा कमी | प्रकल्प मापदंडात बसत नाही |
| iii) | आर्थिक परतावा दर(ERR) | १५.४९ | २५.२१ | १२ पेक्षा जास्त | प्रकल्प मापदंडात बसतो. |
| iv) | सिंचन क्षेत्राची प्रति हेक्टरी किंमत | रु.८.८९ लक्ष प्रति हे. | रु. ८.९८ लक्ष प्रति हेक्टर | मापदंड नाही | -- |
| **६.राजगाव बॅरेज** | | | | | |
| i) | लाभव्यय गुणोत्तर | १.४३ | १.३८ | १ पेक्षा जास्त | प्रकल्प मापदंडात बसतो. |
| ii) | पाणी साठ्याची किंमत प्रती सघमी | रु.२,२५,४९६/- (रु.२५,८५०/- पेक्षा कमी) | रु२,४५,८२९/- | रु.१,२२,१३२/- पेक्षा कमी | प्रकल्प मापदंडात बसत नाही |

| अ. क्र. | निकष | मंजूर प्रथम सुप्रमा मधील मुल्यांक/ (मापदंड) | प्रस्तावित व्दितय सुप्रमा मधील मुल्यांक | प्रचलीत मापदंड | शेरा |
|---|---|---|---|---|---|
| **१.वरुड बॅरेज** | | | | | |
| iii) | आर्थिक परतावा दर(ERR) | १५.४९ | १९.३३ | १२ पेक्षा जास्त | प्रकल्प मापदंडात बसतो. |
| iv) | सिंचन क्षेत्राची प्रति हेक्टरी किंमत | रु.९.५७ लक्ष प्रति हे. | रु. १०.४० लक्ष प्रति हेक्टर | मापदंड नाही | -- |
| **७.उकळी बॅरेज** | | | | | |
| i) | लाभव्यय गुणोत्तर | १.४३ | १.२६ | १ पेक्षा जास्त | प्रकल्प मापदंडात बसतो. |
| ii) | पाणी साठ्याची किंमत प्रती सघमी | रु.३,१५,४०६/- (रु.२५,८५०/- पेक्षा कमी) | रु.३,४५,८३२ | रु.१,२२,१३२/- पेक्षा कमी | प्रकल्प मापदंडात बसत नाही |
| iii) | आर्थिक परतावा दर(ERR) | १५.४९ | १८.९६ | १२ पेक्षा जास्त | प्रकल्प मापदंडात बसतो. |
| iv) | सिंचन क्षेत्राची प्रति हेक्टरी किंमत | रु.१४.७३ लक्ष प्रति हे. | रु. १६.१६ लक्ष प्रति हेक्टर | मापदंड नाही | -- |
| **८.सोनगव्हाण बॅरेज** | | | | | |
| i) | लाभव्यय गुणोत्तर | १.४३ | १.४१ | १ पेक्षा जास्त | प्रकल्प मापदंडात बसतो. |
| ii) | पाणी साठ्याची किंमत प्रती सघमी | रु.१,८६,४४५/- (रु.२५,८५०/- पेक्षा कमी) | रु.२,०१,५३०/- | रु.१,२२,१३२/- पेक्षा कमी | प्रकल्प मापदंडात बसत नाही |
| iii) | आर्थिक परतावा दर(ERR) | १५.४९ | १९.१७ | १२ पेक्षा जास्त | प्रकल्प मापदंडात बसतो. |
| iv) | सिंचन क्षेत्राची प्रति हेक्टरी किंमत | रु.९.११ लक्ष प्रति हे. | रु. ९.८५ लक्ष प्रति हेक्टर | मापदंड नाही | -- |
| **९.टनका बॅरेज** | | | | | |
| i) | लाभव्यय गुणोत्तर | १.४३ | १.१२ | १ पेक्षा जास्त | प्रकल्प मापदंडात बसतो. |
| ii) | पाणी साठ्याची किंमत प्रती सघमी | रु.२,७८,५५९/- (रु.२५,८५०/- पेक्षा कमी) | रु.२,८७,८६१/- | रु.१,२२,१३२/- पेक्षा कमी | प्रकल्प मापदंडात बसत नाही |
| iii) | आर्थिक परतावा दर(ERR) | १५.४९ | १५.९० | १२ पेक्षा जास्त | प्रकल्प मापदंडात बसतो. |
| iv) | सिंचन क्षेत्राची प्रति हेक्टरी किंमत | रु.९.१२ लक्ष प्रति हे. | रु.१२.३९ लक्ष प्रति हेक्टर | मापदंड नाही | -- |
| **१०.ढिल्ली बॅरेज** | | | | | |
| i) | लाभव्यय गुणोत्तर | १.४३ | १.३९ | १ पेक्षा जास्त | प्रकल्प मापदंडात बसतो. |
| ii) | पाणी साठ्याची किंमत प्रती सघमी | रु.२,०१,२८१/- (रु.२५,८५०/- | रु.२,१५,३८०/- | रु.१,२२,१३२/- पेक्षा कमी | प्रकल्प मापदंडात बसत नाही |

| अ. क्र. | निकष | मंजूर प्रथम सुप्रमा मधील मुल्यांक/ (मापदंड) | प्रस्तावित व्दितय सुप्रमा मधील मुल्यांक | प्रचलीत मापदंड | शेरा |
|---|---|---|---|---|---|
| **१.वरुड बॅरेज** | | | | | |
| | | पेक्षा कमी) | | | |
| iii) | आर्थिक परतावा दर(ERR) | १५.४९ | २०.४१ | १२ पेक्षा जास्त | प्रकल्प मापदंडात बसतो. १ |
| iv) | सिंचन क्षेत्राची प्रति हेक्टरी किंमत | रु.१२.०० लक्ष प्रति हे. | रु. १०.०० लक्ष प्रति हेक्टर | मापदंड नाही | -- |
| **११.जयपुर बॅरेज** | | | | | |
| i) | लाभव्यय गुणोत्तर | १.४३ | १.१६ | १ पेक्षा जास्त | प्रकल्प मापदंडात बसतो. |
| ii) | पाणी साठ्याची किंमत प्रती सघमी | रु.२,७१,५२८/- (रु.२५,८५०/- पेक्षा कमी) | रु.३,८४,९३८/- | रु.१,२२,१३२/- पेक्षा कमी | प्रकल्प मापदंडात बसत नाही |
| iii) | आर्थिक परतावा दर(ERR) | १५.४९ | १९.३५ | १२ पेक्षा जास्त | प्रकल्प मापदंडात बसतो. |
| iv) | सिंचन क्षेत्राची प्रति हेक्टरी किंमत | रु.८.८३ लक्ष प्रति हे. | रु. १२.०३लक्ष प्रति हेक्टर | मापदंड नाही | -- |

AMOL BAPURAO FUNDE

Digitally signed by AMOL BAPURAO FUNDE
DN: CN = AMOL BAPURAO FUNDE, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = WATER RESOURCES DEPARTMENT
Date: 2023.03.29 21:15:51 +05'30'

(अमोल फुंदे)
उपसचिव, महाराष्ट्र शासन